**कार्यमूल्यमापन अहवाल (गोपनीय अहवाल) प्रतिवेदित करण्यासाठी सन २०१६-१७ या वर्षासाठी प्रशासन शाखेमधील गट अ व गट ब मधील अधिकाऱ्यांसाठी ध्येयपूर्ती निश्चित करून गुणांकनाच्या आधारे प्रतवारी ठरविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः इएसटी ३९१७/प्र.क्र. ४५/ प्रशा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ११ मे, २०१७

वाचा : सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सिएफआर १२११/प्र.क्र.२५७/तेरा, दिनांक २.२.२०१७

**प्रस्तावना-**

सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २.२.२०१७ च्या शासन निर्णयाद्वारे या विभागाच्या अखत्यारित असलेल्या क्षेत्रीय कार्यालयातील गट-अ मधील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल ऑन लाईन पद्धतीने भरण्याचा निर्णय घेतला आहे. त्यानुसार कार्यमूल्यमापन अहवाल तयार करण्यासाठी गुणांकन पद्धत निश्चित करण्यात आली आहे. सदर गुणांकनासाठी तीन भाग करण्यात आलेले आहेत - i) कार्यपूर्तता, ii) वैयक्तिक गुणवैशिष्ट्ये, iii) कार्यक्षमता. कार्यपूर्ततेच्या गुणांकनासाठी शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील गट अ व गट ब मधील अधिकाऱ्यांचे उद्दिष्टपूर्ती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. कार्यमूल्यमापन अहवालासाठी उद्दिष्टपूर्तीचे निकष तयार करण्यासाठी विभागास नेमून दिलेले KRA विचारात घेवून क्षेत्रिय कार्यालयातील अधिकाऱ्यांशी विचारविनिमय करून कार्यमूल्यमापन अहवालासाठी उद्दिष्टपूर्तीचे निकष निश्चित करण्यात आले असून ते पुढील प्रमाणे आहेत -

**शासन निर्णय -**

शिक्षणाधिकारी (प्राथमिक), शिक्षणाधिकारी (माध्यमिक) तसेच उपशिक्षणाधिकारी (प्राथमिक), उपशिक्षणाधिकारी (माध्यमिक) व सर्व गटशिक्षणाधिकारी यांचे सन २०१६-१७ या वर्षाचे कार्यमूल्यमापन

अहवाल लिहिण्यासाठी खालीलप्रमाणे उद्दिष्टे व उद्दिष्टपूर्तीनंतर द्यावयाचे गुणांकन निश्चित करण्यात येत आहेत.

| क्र | उद्दिष्ट्ये | गुणांकन | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | **प्रगत शाळा सन (२०१६-१७)** | **१० गुण** | **९ गुण** | **८ गुण** | **७ गुण** | **६ गुण** | **५ गुण** |
| अ) | प्राथमिक शाळा ५०% प्रगत करणे. | ५०% किंवा त्यापेक्षा अधिक | ५०% ते ४८% दरम्यान | ४८% ते ४६% दरम्यान | ४६% ते ४४% दरम्यान | ४४% ते ४२% दरम्यान | ४२% पेक्षा कमी |
| ब) | उच्च प्राथमिक शाळा २५% प्रगत करणे. | २५% किंवा त्यापेक्षा अधिक | २५% ते २३% दरम्यान | २३% ते २१% दरम्यान | २१% ते १९% दरम्यान | १९% ते १७% दरम्यान | १७% पेक्षा कमी |
| क) | माध्यमिक शाळा २०% प्रगत करणे. | २०% किंवा त्यापेक्षा अधिक | २०% ते १९% दरम्यान | १९% ते १८% दरम्यान | १८% ते १७% दरम्यान | १७% ते १६% दरम्यान | १६% पेक्षा कमी |
| | आदिवासी / नक्षलग्रस्त / दुर्गम भागात कार्यरत अधिकाऱ्यांनी वरील उद्दिष्ट पूर्ण केल्यास निश्चित केलेल्या गुणांकनापेक्षा एक गुण अधिक देण्यात यावेत. | | | | | | |
| २ | **शाळा सिद्धी** | **१० गुण** | **९ गुण** | **८ गुण** | **७ गुण** | **६ गुण** | **५ गुण** |
| | A ग्रेड शाळा | १०% *व त्यापेक्षा अधिक* | १०% *ते*९% दरम्यान | ९% ते ८% दरम्यान | ८% ते ७% दरम्यान | ७% ते ६% दरम्यान | ६% पेक्षा कमी |
| ३ | Hand Wash Station in school | १०% *व* त्यापेक्षा अधिक | १०% *ते*९% दरम्यान | ९% ते ८% दरम्यान | ८% ते ७% दरम्यान | ७% ते ६% दरम्यान | ६% पेक्षा कमी |
| ४ | पिण्यायोग्य पाण्याची व्यवस्था | १०० % ते ९० % दरम्यान | ९०% ते ८०% दरम्यान | ८०% ते ७५% दरम्यान | ७५% ते ७% दरम्यान | ७०% ते ६५% दरम्यान | ६५% पेक्षा कमी |
| ५ | पाण्यासह शौचालयाची व्यवस्था (Functional Toilet) | १०० % ते ९० % दरम्यान | ९० % ते ८० % दरम्यान | ८० % ते ७५ % दरम्यान | ७५% ते ७०% दरम्यान | ७०% ते ६५% दरम्यान | ६५% पेक्षा कमी |
| ६ | शाळाबाह्य मुले | **१० गुण** | **९ गुण** | **८ गुण** | **७ गुण** | **६ गुण** | **५ गुण** |
| | ६ ते १४ वयोगट | ०.४% अथवा त्यापेक्षा कमी असल्यास | ०.४% ते ०.५% दरम्यान | ०.५% ते ०.६% दरम्यान | ०.६% ते ०.७% दरम्यान | *०.७% ते ०.८%* दरम्यान | ०.८% पेक्षा अधिक असल्यास |
| ७ | डिजिटल शाळा | **१० गुण** | **९ गुण** | **८ गुण** | **७ गुण** | **६ गुण** | **५ गुण** |

| **क्र** | **उद्दिष्ट्ये** | **गुणांकन** | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | सरासरी प्रमाण | १००% | ९०% | ८०% | ७०% | ६०% | ६०% पेक्षा कमी असल्यास |
| ८ | विद्यार्थ्यांची गळती | **१० गुण** | **९ गुण** | **८ गुण** | **७ गुण** | **६ गुण** | **५ गुण** |
| अ) | प्राथमिक शाळा (१ली ते ५वी) | ०.४% अथवा त्यापेक्षा कमी असल्यास | ०.४% ते ०.५% दरम्यान | ०.५% ते ०.६% दरम्यान | ०.६% ते ०.७% दरम्यान | ०.७% ते ०.८% दरम्यान | ०.८% पेक्षा अधिक गळती असल्यास |
| ब) | उच्च प्राथमिक शाळा (६वी ते ८वी) | ०.८% अथवा त्यापेक्षा कमी असल्यास | ०.८% ते १.०% दरम्यान | १.०% ते १.१०% दरम्यान | १.१०% ते १.४०% दरम्यान | १.४०% ते १.६०% दरम्यान | १.६०% पेक्षा अधिक गळती असल्यास |
| क) | माध्यमिक शाळा (९वी ते १०वी) | १.२% अथवा त्यापेक्षा कमी असल्यास | १.२% ते १.५% दरम्यान | १.५% ते १.८% दरम्यान | १.८% ते २.१% दरम्यान | २.१% ते २.४% दरम्यान | २.४% पेक्षा अधिक गळती असल्यास |
| ९ | **कार्यालयीन कामकाज** | | | | | | |
| अ) | लेखा आक्षेप पूर्तता | **१० गुण** | **९ गुण** | **८ गुण** | **७ गुण** | **६ गुण** | **५ गुण** |
| i) | स्थानिक लेखा आक्षेप | एकूण प्रलंबित आक्षेपापैकी निकाली काढलेले | २४% निकाली काढल्यास | २३% निकाली काढल्यास | २२% निकाली काढल्यास | २१% निकाली काढल्यास | २०% व त्यापेक्षा कमी निकाली काढल्यास |
| ii) | महालेखाकारांचे लेखा आक्षेप | १००% ते ९०% प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ९०% ते ८०% प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ८०% ते ७०% प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ७०% ते ६०% प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ६०% ते ५०% पेक्षा कमी प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ५०% व त्यापेक्षा कमी निकाली काढल्यास |
| ब) | सेवानिवृत्तीच्या एकूण | **१० गुण** | **९ गुण** | **८ गुण** | **७ गुण** | **६ गुण** | **५ गुण** |

| क्र | उद्दिष्ट्ये | गुणांकन | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | हाताळावयाच्या प्रकरणांपैकी या वर्षी निकाली काढलेल्या प्रकरणांची संख्या | ० प्रलंबित असल्यास | १ प्रलंबित असल्यास | २ प्रलंबित असल्यास | ३ प्रलंबित असल्यास | ४ प्रलंबित असल्यास | ५ किंवा त्यापेक्षा अधिक प्रलंबित असल्यास |
| क) | न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने करण्यात आलेली कार्यवाही (Filing Affidavits, Removing Objection, pursuation of matter) | १००% ते ९०% प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ९०% ते ८०% प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ८०% ते ७०% प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ७०% ते ६०% प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ६०% ते ५०% पेक्षा कमी प्रकरणा मध्ये पूर्ण झाली असल्यास | ५०% व त्यापेक्षा कमी निकाली काढल्यास |

टिप - न्यायालयीन प्रकरणामध्ये विभागीय शिक्षण उपसंचालक स्तरावर जिल्हानिहाय न्यायालयीन प्रकरणांची यादी अद्ययावत ठेवावयाची आहे. शासनाच्या वतीने दाखल करावयाचे शपथपत्र विहित मुदतीत दाखल करावे. तसेच शासनाविरूद्ध एकतर्फी निकाल लागल्यास ५ गुण देण्यात येतील.

वरीलप्रमाणे उद्दिष्टांकरीता गुणांकन देताना उद्दिष्टपूर्ती झाली किंवा कसे हे U-Dise प्रणालीवरून तपासून पहावे. तसेच त्यामध्ये काही अडचणी आल्यास आयुक्त (शिक्षण) यांच्याकडून मार्गदर्शन घ्यावे.

२. शिक्षणाधिकारी / उपशिक्षणाधिकारी (प्राथमिक) हे त्यांच्या अधिनस्त असलेल्या प्राथमिक शाळांशी संबंधित व शिक्षणाधिकारी (माध्यमिक) व उपशिक्षणाधिकारी (माध्यमिक) हे त्यांच्या अधिनस्त असलेल्या माध्यमिक शाळांशी संबंधित उद्दिष्टपूर्तीनुसार स्वयंमूल्यनिर्धारण अहवाल लिहितील. त्यांचे प्रतिवेदन अधिकारी व पुनर्विलोकन अधिकारी हे परिशिष्ट (भाग-३) मधील अ) कार्यपूर्तता मध्ये गुणांकन निश्चित करतील. अधिकाऱ्यांची गुणवैशिष्ट्ये अतिउत्कृष्ट असतील व ते कार्यक्षम असतील तरच कार्यपूर्तता करण्यात यशस्वी होतील. त्यामुळे वैयक्तिक गुणवैशिष्टे व कार्यक्षमता या दोन भांगाचे गुण कार्यपूर्ततेवर आधारीत राहतील. त्यामुळे कार्यपूर्ततेमधील गुणांपेक्षा वैयक्तिक गुणवैशिष्टये व कार्यक्षमता या भागामध्ये

अधिक गुण देता येणार नाहीत. गटशिक्षणाधिकारी हे गटाचे शैक्षणिक प्रमुख असल्याने त्यांच्या कार्यक्षेत्रातील प्राथमिक व माध्यमिक शाळांचे उद्दिष्टये त्यांना लागू राहतील.

३. विभागीय शिक्षण उपसंचालक यांची उद्दिष्टये हे त्यांच्या विभागातील प्राथमिक व माध्यमिक शाळांशी संबंधित राहतील. विभागीय शिक्षण उपसंचालकांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या प्राथमिक व माध्यमिक शाळा यांचा एकत्रित गुणांकन अहवाल कार्यमूल्यमापन अहवालासोबत सादर करावयाचा आहे. त्यानुसार शिक्षण संचालक (प्राथमिक) व शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे कार्यमूल्यमापन अहवाल हे अनुक्रमे राज्यातील प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळांच्या उद्दिष्टपूर्तीशी निगडीत राहतील व त्यांचे गुणांकन त्यानुसार ठरविण्यात येईल.

४. वरील अधिकाऱ्यांव्यतिरिक्त उर्वरित अधिकाऱ्यांच्या कार्यमूल्यमापन अहवालाचे सन २०१६-१७ या प्रतिवेदन वर्षाचे उद्दिष्टये व गुणांकन ठरविण्याची जबाबदारी संबंधित विभाग प्रमुखांची राहील. हा शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर आठ दिवसाच्या आत संबंधित विभाग प्रमुख यांनी उद्दिष्ट व गुणांकन निश्चित करून संबंधित अधिकाऱ्यांना अवगत करावे. शिक्षण संचालक (संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय / संचालक, बालभारती / अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ / अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद) यांचे उद्दिष्टये व गुणांकन निश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त (शिक्षण) यांची राहिल. तसेच सदर शिक्षण संचालकांच्या अधिपत्याखालील शिक्षण सहसंचालक, शिक्षण उपसंचालक या अधिकाऱ्यांची देखील उद्दिष्ट्ये व गुणांकन निश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त (शिक्षण) यांची राहील. नमूद शिक्षण संचालकांच्या अधिनस्त असलेल्या शिक्षणाधिकारी, प्रशासनाधिकारी, उपशिक्षणाधिकारी, अधिक्षक संवर्गातील अधिकाऱ्यंचे सन २०१६-१७ या वर्षासाठी उद्दिष्टये व गुणांकन निश्चित करण्याची जबाबदारी संबंधित शिक्षण संचालकांची राहील. संबंधित शिक्षण संचालकांनी सदर कार्यवाही करून हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून आठ दिवसाच्या आत सर्व संबंधित अधिकाऱ्यांना उद्दिष्टये व गुणांकन निश्चितीबाबत माहिती द्यावी.

५. विद्या प्राधिकरण तसेच शिक्षण सक्षमीकरण शाखा (प्रशिक्षण शाखा) यामधील प्राचार्य, वरिष्ठ अधिव्याख्याता व अधिव्याख्याता या संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी सन २०१६-१७ या वर्षासाठी उद्दिष्टे व

गुणांकन निश्चित करण्याची जबाबदारी संचालक, विद्या प्राधिकरण यांची राहील. याबाबत वर दिलेल्या विहित कालमर्यादेत कार्यवाही करावयाची आहे.

६. या विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील गट अ व गट ब मधील अधिकाऱ्यांचे सन २०१६-१७ या वर्षाचे कार्यमूल्यमापन अहवाल (गोपनीय अहवाल) विहित वेळेत लिहिणे सर्व अधिकाऱ्यांवर बंधनकारक आहे. याबाबत खालील वेळापत्रकाचे काटेकोरपणे पालन करावे.

| कार्य | अंतिम तारीख |
|---|---|
| विभाग कार्यालयाच्या संस्करण अधिकाऱ्यांनी प्रतिवेदन आणि पुनर्विलोकन अधिकाऱ्यांचे नाव नमूद करून कोरा कार्यमूल्यमापन अहवालाचा नमुना अधिकाऱ्यांना देणे. | मार्च महिन्याचा शेवटचा आठवडा |
| स्वयंमुल्यनिर्धारण | १५ एप्रिल |
| प्रतिवेदन अधिकाऱ्यांचे मूल्यमापन | ३० एप्रिल |
| पुनर्विलोकन अधिकाऱ्यांचे मुल्यमापन | १५ मे |
| संबंधित अधिकाऱ्यास प्रत उपलब्ध करून देणे. | ३० जून |

७. शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखाली गट अ व गट ब मधील सर्व अधिकाऱ्यांचे सन २०१६-१७ या वर्षाचे कार्यमूल्यमापन अहवाल सोबत जोडलेल्या परिशिष्ट अ प्रमाणे लिहिण्यात यावेत. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या निर्णयानुसार गट अ मधील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल ऑन- लाईन पद्धतीने MahaPAR या प्रणालीद्वारे निश्चित करण्यात येतील. गट ब मधील अधिकाऱ्यांचे कार्यमूल्यमापन अहवाल सोबत जोडलेल्या प्रपत्रानुसार लिहिण्याची जबाबदारी सर्व अधिकारी, त्यांचे प्रतिवेदन अधिकारी व पुर्नविलोकन अधिकारी यांची राहील. यापूर्वी विहित केलेल्या नमुन्यानुसार लिहिण्यात येणारे गोपनीय अहवाल पदोन्नतीसाठी व आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत देण्यात येणाऱ्या लाभासाठी विचारात घेण्यात येणार नाहीत.

८. गट अ व गट ब मधील अधिकाऱ्यांसाठी गुणनिहाय प्रतवारी सामान्य प्रशासन विभागाने खालीलप्रमाणे निश्चित केली आहे. त्यामध्ये सामान्य प्रशासन विभागाकडून सुधारणा झाल्यास त्यानुसार प्रतवारी सुधारित / निश्चित करण्यात यावी.

| गुण | प्रतवारी |
|---|---|
| ९ किंवा १० | अ+ |
| ६ ते ८ | अ |
| ५ ते ३ | ब |
| २ किंवा १ | क |

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१२१७३३५९२९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Ganpat Gunjal

Digitally signed by Ramchandra Ganpat Gunjal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=27e28d18e47077c7c6f72f1caad1c46a2a54bad8e8e20ae7469973186aa51fa1, cn=Ramchandra Ganpat Gunjal
Date: 2017.05.12 17:30:55 +05'30'

(रा. ग. गुंजाळ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सर्व शिक्षण संचालक/सह संचालक/उप संचालक, महाराष्ट्र राज्य.
३. सर्व शिक्षणाधिकारी
४. सर्व उपशिक्षणाधिकारी
५. प्रशासन अधिकारी, आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय यांनी सा. प्र. वि. च्या दि. २.२.२०१७ सोबत जोडलेल्या नमुन्यानुसार गोपनीय अहवाल लिहिण्यासाठी गट ब च्या सर्व अधिकाऱ्यांना तात्काळ उपलब्ध करून द्यावे.
६. निवड नस्ती / प्रशा. - २

**प्रत माहितीसाठी -**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे विशेष कार्यकारी अधिकारी.
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहाय्यक.